**भारतीय नौदलाच्या INS हमला, मालाड (पश्चिम), मुंबई येथील एमबीए (लॉजिस्टिक मॅनेजमेंट) या अभ्यासक्रमास शैक्षणिक वर्ष २०१४-१५ पासून अखिल भारतीय तंत्राशिक्षण परिषदेने दिलेल्या मुदतवाढीस व प्रवेशक्षमता वाढीस मान्यता देणबाबत....**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्रशिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्र.टीईएम-२०१४/प्र.क्र.१०५/तांशि-४**
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२
दिनांक: २७ मे, २०१५.

वाचा :- १) शासन पत्र, उच्च व तंत्राशिक्षण विभाग क्र.टीईएम-२०१४/प्र.क्र.१०५/तांशि-४, दिनांक २३/५/२०१४
२) मुंबई विद्यापीठाचे पत्र क्र.युजी/४९/२०१४, दिनांक १०/११/२०१४
३) अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, नवी दिल्ली यांचे पत्र वेस्टर्न/१-२०१४११७३७९/२०१४/EOA/कॉरिजेन्डम-२,दि.२.३.२०१५
४) संचालक, तंत्रशिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.२/एनजीसी/ मान्यता/२०१५/५८८, दि.२२-४-२०१५

**प्रस्तावना :**

भारतीय नौदलाच्या INS हमला, मार्वे, मालाड (पश्चिम), मुंबई येथे भारतीय नौदलातील अधिकारी व नौसैनिकांना विविध प्रकारचे व्यवस्थापन अभ्यासक्रम शिकविले जातात. सदर अभ्यासक्रम २ ते ४८ आठवडे अशा कालावधीचे आहेत. तसेच या ठिकाणी भारतीय भू-सेना, भारतीय हवाई दल व तट रक्षक दल यामधील अधिका-यांनादेखील प्रशिक्षण देण्यात येते. याशिवाय परदेशातील नौदलातील अधिका-यांनाही प्रशिक्षण देण्यात येते. सदर संस्थेत एम.बी.ए. (लॉजिस्टिक मॅनेजमेंट) हा अभ्यासक्रम ४८ आठवडयांचा असून तो वार्षिक तत्वावर राबविण्यात येतो व तो दरवर्षी जुलैपासून सुरु होतो. सदर अभ्यासक्रमास अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषदेची मान्यता आहे.

२. सदर अभ्यासक्रम गोवा विद्यापीठाशी संलग्नित होता, परंतु मा.सर्वोच्च न्यायालयाच्या आदेशानुसार राज्यातील विद्यापीठाच्या कार्यकक्षेबाहेरील संस्थांना संलग्निकरण देता येत नाही. त्यामुळे गोवा विद्यापीठाने आय.एन.एस. हमला येथील वरील अभ्यासक्रमाला संलग्नता प्रदान करण्यास असमर्थतता दर्शविली होती. यास्तव आय.एन.एस. हमला मुंबई विद्यापीठाच्या कार्यकक्षेत येत असल्यामुळे या अभ्यासक्रमास मुंबई विद्यापीठाचे संलग्नीकरण मिळण्यासाठी महाराष्ट्र शासनाचे ना-हरकत प्रमाणपत्र विद्यापीठाला सादर करणे जरुरीचे असल्यामुळे वरील वाचा १) येथील पत्र क्र.टीईएम-२०१४/प्र.क्र.१०५/तांशि-४, दिनांक २३ मे,२०१४ अन्वये मुंबई विद्यापीठाला सदर संस्थेस, अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषदेकडून शैक्षणिक वर्ष २०१४-१५ करीता शैक्षणिक मुदतवाढ (E.O.A.) प्राप्त

करुन घेण्याच्या अटीवर, शासनाने ना-हरकत दिली आहे. त्यास अनुसरुन अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, नवी दिल्ली यांनी दिनांक १ जुलै,२०१४ च्या पत्रान्वये मुदतवाढ व मुंबई विद्यापीठाने दिनांक ८ ऑगस्ट,२०१४ च्या पत्रान्वये सदर संस्थेस शैक्षणिक वर्ष २०१४-१५ करीता एमबीए अभ्यासक्रमाच्या नवीन संस्थेस प्रथम संलग्नीकरण मंजूर केलेले आहे.

३. तसेच शैक्षणिक वर्ष २०१४-१५ मध्ये सदर अभ्यासक्रमाच्या (एमबीए - २० वरुन २८) प्रवेशक्षमता वाढीस अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, नवी दिल्ली यांनी वरील वाचा ३) येथील दिनांक २ मार्च,२०१५ च्या पत्रान्वये मंजुरी दिली आहे. त्यानुसार शैक्षणिक वर्ष २०१४-१५ मध्ये एमबीए अभ्यासक्रमाची संस्था सुरु करण्यास तसेच २० वरुन २८ अशी प्रवेशक्षमता वाढ करण्यास शासन निर्णय निर्गमित करण्याबाबत संचालक, तंत्र शिक्षण यांनी वरील वाचा ४) येथील पत्रान्वये प्रस्ताव सादर केला आहे. संचालक, तंत्र शिक्षण यांनी प्रस्तावित केल्यानुसार व अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषदेने दिलेल्या मुदतवाढीनुसार व उपरोक्त अभ्यासक्रमाच्या २० वरुन २८ प्रवेशक्षमता वाढीस दिलेल्या मान्यतेस अनुसरुन शासनाची मान्यता देण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

भारतीय नौदलाच्या INS हमला, मार्वे, मालाड (पश्चिम), मुंबई येथील एमबीए (लॉजिस्टिक मॅनेजमेंट) या अभ्यासक्रमास शैक्षणिक वर्ष २०१४-१५ पासून मान्यता तसेच सदर अभ्यासक्रमाच्या २० वरुन २८ अशा प्रवेशक्षमता वाढीस शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

१) अखिल भारतीय तंत्राशिक्षण परिषदेने विहित केलेल्या तसेच दिनांक २१ मे,१९८३ च्या शासन निर्णयान्वये विहित केलेल्या अटींची पूर्तता करणे संबंधित संस्थेस बंधनकारक राहील. सदर अभ्यासक्रमासाठी संस्थेची प्रवेशक्षमता वर नमूद केल्याप्रमाणे राहील.

२) सदर अभ्यासक्रमाच्या संलग्नीकरणासाठी संस्थेने महाराष्ट्र राज्य विद्यापीठ अधिनियम,१९९४ मधील तरतूदीनुसार संबंधित विद्यापीठाची मान्यता/संलग्नीकरण घेणे आवश्यक राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा सांकेताक २०१५०५२७११५३३२६२०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.**

Madan
Maruti Morve

Digitally signed by Madan Maruti Morve
DN: CN = Madan Maruti Morve, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Under Secretary
Date: 2015.05.28 16:45:01 +05'30'

**(म.मा.मोरवे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई

२. सहसंचालक, तंत्रशिक्षण, विभागीय कार्यालय,मुंबई (संचालक, तंत्र शिक्षण यांच्यामार्फत)
३. कमांडींग ऑफिसर, INS हमला, मार्वे, मालाड (पश्चिम), मुंबई ४०० ०९५
४. अतिरिक्त सचिव (तांत्रिक), भारत सरकार, अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, ७ वा मजला, चंद्रलोक भवन, जनपथ, नवी दिल्ली - ११० ००१.
५. सहायक शिक्षण सल्लागार (तांत्रिक), भारत सरकार, मनुष्यबळ विकास मंत्रालय (शिक्षण विभाग), नवी दिल्ली.
६. विभागीय अधिकारी, अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, पश्चिम विभागीय कार्यालय, इंडस्ट्रियल इन्शुरन्स बिल्डींग, २ रा मजला, चर्चगेट, मुंबई.
७. निवड नस्ती, तांशि-४